राज्य योजना सन २०२२-२३

वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी- ०५.२२/प्र.क्र.१३०/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १६ फेब्रुवारी, २०२३.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.११/(२२-२३)/५२४/, दिनांक १४.१२.२०२२.
३. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्युएलपी १२.२२/प्र.क्र.३८०/ फ-१, दिनांक :- १४ फेब्रुवारी, २०२३.

प्रस्तावना :-

सन २०२२-२३ आर्थिक वर्षाकरिता वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ८७००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२२ ला अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये सन २०२२-२३ करीता प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या योजनेतंर्गत मौजे दौलताबाद सर्व्हे क्रमांक ६११ औरंगाबाद येथे ट्रांझीट ट्रीटमेंन्ट सेन्टर उभारण्याकरीता रु. १४८७.९९ लक्ष निधी वितरणाचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. तथापि, संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये मौजे दौलताबाद, औरंगाबाद येथिल ट्रांझीट ट्रीटमेंन्ट सेन्टर बांधकामाच्या रु. ११२४.०३ लक्षच्या ढोबळ अंदाजपत्रकास शासन मान्यता प्रदान करण्यात आली असून त्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या लेखाशिर्षांतर्गत संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या अधिन राहून मौजे दौलताबाद, औरंगाबाद येथिल ट्रांझीट ट्रीटमेंन्ट सेन्टरच्या बांधकामाकरीता **रु. ११२४.०३ लक्ष** इतका निधी खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

i. सदर योजनेवर होणारा खर्च सन २०२२-२३ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीव, पंचवार्षिक योजनाअंतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (००) (१०) वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना

(२४०६ २२३२) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

ii. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

iii. शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावातील कार्यबाबींवर वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या योजने व्यतिरीक्त इतर योजनेमधून निधी खर्च होणार नाही याची कृपया दक्षता घ्यावी.

iv. सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण ) अधिनियम, १९७२ व वन (संवर्धन) अधिनियम, १९८० तसेच राष्ट्रीय प्राणी संग्रहायलयाच्या मार्गदर्शक तत्वांचा भंग होणार नाही व आवश्यक ती परवानगी घेतली गेली आहे ह्याची दक्षता घ्यावी.

v. प्रस्तावात नमूद ज्या कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांची प्रशासकीय मंजूरी मिळाली आहे त्यावरच वितरीत अनुदान खर्च होईल याची खातरजमा करण्यात यावी.

vi. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

vii. प्रस्तावित असलेल्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

viii. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

ix. सदर योजनेच्या अनुषंगाने विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वे व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

x. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/ अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०२१७११४१४३६११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.02.17 11:47:10 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य प्राणि संग्रहालय प्राधिकरण, नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), औरंगाबाद.
६. उप वनसंरक्षक (प्रादेशिक), औरंगाबाद.
७. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
८. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

********